मुंबई मेट्रो मार्ग-४ (वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली) व मुंबई मेट्रो मार्ग-४अ (कासारवडवली-गायमुख) प्रकल्पासाठी राज्य शासनाचे दुय्यम कर्ज मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास वितरीत करण्याबाबत. (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२४/प्र.क्र.९९/नवि-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १९ मार्च, २०२५.

**पहा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१५/प्र.क्र.११३/नवि-७, दिनांक १७ ऑक्टोबर,२०१५.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१७/प्र.क्र.१३८/नवि-७, दिनांक २ नोव्हेंबर, २०१८ (बिनव्याजी दुय्यम कर्ज).
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२४/प्र.क्र.९९/नवि-७, दि.२४ डिसेंबर, २०२४.

**प्रस्तावना :**

मुंबई मेट्रो मार्ग ४ (वडाळा-घाटकोपर-मुलुंड-ठाणे-कासारवडवली) व ४अ (कासारवडवली ते गायमुख) या प्रकल्पाच्या मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणीस अनुक्रमे दि. २५.१०.२०१८ व २५.०१.२०१९ रोजी राज्य शासनाने मान्यता प्रदान केली आहे. सदर प्रकल्पांवरील केंद्रीय करांच्या ५०%, राज्यशासनाचे कर व प्रकल्पासाठी आवश्यक खाजगी जमिनीवरील खर्चासाठी एकूण अनुक्रमे रु.३,६९३ कोटी व रू. १५७.७७ कोटी निधी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज स्वरुपात उपलब्ध करावयाचा आहे. सदर दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड प्रकल्प अंमलबजावणी संस्था म्हणून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावयाची आहे. सदर प्रकल्पासाठी केएएफड्ब्ल्यु, जर्मनी या आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थेकडून मुख्य कर्ज घेण्यात आले असून मुख्य कर्जाची परतफेड मुंबई महानगर प्रदेश विकस प्राधिकरणाने करावयाची आहे.

मुंबई मेट्रो-४ व ४अ या प्रकल्पांसाठी चालू वित्तीय वर्ष २०२४-२५ मध्ये राज्य शासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य या प्रयोजनासाठी रु. १५५.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. सन २०२४-२५ मधील तरतूदीमधून मुंबई मेट्रो मार्ग-४ व ४अ प्रकल्पांसाठी **रु.४६.५० कोटी** मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. मुंबई मेट्रो मार्ग-४ व ४अ प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून **रु.४६,५०,००,०००/- (अक्षरी रुपये शेचाळीस कोटी पन्नास लाख फक्त)** इतकी रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदरचे निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

२. उपरोक्त रक्कम मागणी क्र. एफ-७ ६२१७-नगर विकासासाठी कर्जे ६०, इतर नगर विकास योजना १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे- राज्य योजना (००) (०१) मुंबई मेट्रो-४ रेल्वे प्रकल्पाकरिता एमएमआरडीएला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ कर्जे व आगाऊ रकमा सांकेतांक क्र. (६२१७०८१२) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मधील मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव नवि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी प्राप्त रक्कम **रु.४६.५० कोटी** रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांच्याकडे वर्ग करावी. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून **रु.४६.५० कोटी** रक्कम मुंबई मेट्रो मार्ग-४ व ४अ प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत केंद्रीय व राज्यस्तरीय/स्थानिक कर/ खाजगी जमिनीपोटी येणाऱ्या खर्चासाठी वितरीत करण्यात येत आहे.

५. राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज म्हणून वितरीत **रु.४६.५० कोटी** रकमेची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून सदर प्रकल्पासाठी बाह्य वित्तीय संस्थाकडून घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करण्यात यावी.

६. सदर कर्ज सहाय्याच्या रक्कमेवर भविष्यात व्याज आकारणी करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास कर्जाची परतफेड त्याच्या व्याजाच्या रक्कमेसह सदर प्रकल्पाचे मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

७. मुंबई मेट्रो मार्ग ४ व ४अ प्रकल्पाकरिता राज्य शासनाकडून केंद्रीय/राज्यस्तरीय कर व खाजगी जमिनीपोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

८. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल राज्य शासनास सादर करण्यात यावा.

९. सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून तसेच राज्य शासनामार्फत केंद्रीय/राज्यस्तरीय कर व खाजगी जमिनीपोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने स्वतंत्र लेखे ठेवावेत.

१०. राज्यशासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जसहाय्यासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

११. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१२. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो-४ प्रकल्पाकरीता आतापर्यंत **रु.३९४.५० कोटी** व मुंबई मेट्रो -४अ प्रकल्पाकरीता **रु.५८.५० कोटी** इतका निधी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | दिनांक | रक्कम (रू. कोटीत) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | २६.०३.२०१९ | २०.०० | राज्य शासन | २०.०० |
| २ | १८.०३.२०२० | २७.०० | राज्य शासन | ४७.०० |
| ३ | २७.०३.२०२० | १८.०० | राज्य शासन | ६५.०० |
| ४ | ०४.०३.२०२१ | २२.५० | राज्य शासन | ८७.५० |
| ५ | १०.०३.२०२२ | ४२.०० | राज्य शासन | १२९.५० |
| ६ | २५.०८.२०२२ | ४८.०० | राज्य शासन | १७७.५० |
| ७ | २१.०३.२०२२ | ३२.०० | राज्य शासन | २०९.५० |
| ८ | ०४.०७.२०२३ | २७.०० | राज्य शासन | २३६.५० |
| ९ | २९.०८.२०२३ | ४०.५० | राज्य शासन | २७७.०० |
| १० | २२.०३.२०२४ | ३२.५० | राज्य शासन | ३०९.५० |
| ११ | २४.०६.२०२४ | ४०.०० | राज्य शासन | ३४९.५० |
| १२ | २४.१२.२०२४ | ४५.०० | राज्य शासन | ३९४.५० |
| १३ | सदरचे वितरण | ३२.०० | राज्य शासन | **४२६.५०** |

१३. राज्य शासनाकडून मुंबई मेट्रो-४अ प्रकल्पाकरीता सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे :-

| अनु.क्र. | दिनांक | रक्कम (रू. कोटीत) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | २२.०३.२०२४ | ३५.०० | राज्य शासन | ३५.०० |
| २ | २४.०६.२०२४ | ११.६६१५ | राज्य शासन | ४६.६६१५ |
| ३ | २४.१२.२०२४ | ११.८३८५ | राज्य शासन | ५८.५० |
| ४ | सदरचे वितरण | १४.५० | राज्य शासन | **७३.००** |

१४. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ सोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१५. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

१६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१२५९१७०३२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d2585244352 7f4a3927a849feec29ce26368b8badbee9e6985 2845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF874241 18BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.19 13:00:06 +05'30'

[विजय चौधरी]
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.

३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.

४. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
९. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. वित्त विभाग कार्यासन- व्यय-३, अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४), मंत्रालय, मुंबई.
१५. सह सचिव नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कक्ष अधिकारी नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१७. रोख शाखा (नवि) (३ प्रती), मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२४/प्र.क्र.९९/नवि-७, दिनांक : १९ मार्च, २०२५ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांना मुंबई मेट्रो रेल्वे लाईन-४ (वडाळा-घाटकोपर-ठाणे-कासारवडवली) व ४अ (कासारवड्वली-गायमुख) या प्रकल्पांसाठी सन २०२४-२४ मध्ये रु.४६.५० कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१ |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.१२/०२/२०२५ |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | मेट्रो-४ : रु.३६९३ कोटी<br>मेट्रो-४अ: रू.१५७.७७ |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१८-१९: रु. २० कोटी;<br>सन २०१९-२० : रु. ४५ कोटी;<br>सन २०२०-२१ : रु. २२.५० कोटी;<br>सन २०२१-२२: रु.४२ कोटी:<br>सन २०२२-२३ रु.८० कोटी<br>सन २०२३-२४ - रू. १३५ कोटी<br>सन २०२४-२५-रु.१०८.५० कोटी<br>(या वितरणापूर्वी) |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | मेट्रो-४ करिता रु.३२.०० कोटी व<br>मेट्रो-४अ करिता रु.१४.५० कोटी |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | - |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **एकूण रु.४६.५० कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | सदर प्रकल्पासाठी केफड्ब्ल्यु बँककडून घेण्यात आलेल्या मुख्य कर्जाची परतफेड माहे नोव्हेंबर, २०४० पर्यंत होणार आहे. तद्नंतर दुय्यम कर्जाची परतफेड सन २०४१ मध्ये सूरु होईल. सदर दुय्यम कर्जाची वसूली एका हप्त्यात होणे अपेक्षित आहे. |

VIJAY KARBHARI
CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE073405817
33B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.19 13:00:35 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही |
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | सन २०४६ |
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | सन २०४६ |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | सन २०४६ |
| १४. | व्याज दर | बिनव्याजी कर्ज |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | लागू नाही |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | मागणी क्र. एफ-७ ६२१७-नगर विकासासाठी कर्जे ६०, इतर नगर विकास योजना १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे- राज्य योजना (००)(०१) मुंबई मेट्रो-४ रेल्वे प्रकल्पाकरिता मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ कर्जे व आगाऊ रकमा सांकेतांक क्र. (६२१७०८१२) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | लागू नाही. |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | मुख्य लेखा अधिकारी<br>मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,<br>वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे(पूर्व), मुंबई. |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

VIJAY KARBHARI
CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70,
cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.19 13:01:01 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**************